सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१८/प्र.क्र.५१/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-०८ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. माविम-२०१८/प्र.क्र.५१/का-१०, दि.०१ ऑगस्ट, २०१८.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात २२३५-१३१६ या लेखाशिर्षाखाली वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ येथील परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६, ३६ सहायक अनुदाने (वेतन ) या बाबीसाठी उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूद र ₹१५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी फक्त) च्या ७०% मर्यादेत ₹१०,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी माविमला संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.५ येथील परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध उर्वरित अवितरीत निधी ₹४,५०,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी पन्नास लाख फक्त) माविमला वितरीत करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६ या लेखाशिर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या बाबीसाठी उपलब्ध अवितरीत तरतूद **₹४,५०,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी पन्नास लाख फक्त)** इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाव्दारे

अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

४. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण, (०३) इतर योजना, (०३) (०१) महिला आर्थिक विकास महामंडळ (२२३५ १३१६) (महिला सक्षमीकरण), (कार्यक्रम), ३६ सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

५. वित्त विभागाच्या दि.०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या परिपत्रकानुसार सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमूद तपासणी सूचीतील अटींची तसेच परिच्छेद-७ मधील अटींची पुर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावर सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक दि.०२ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी, २०१९ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२१२१६२६०२०८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.02.12 16:28:23 +05'30'

(स्मिता निवतकर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.